**प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२४-२५ अंतर्गत गडचिरोली जिल्ह्यातील पर्यटन विकास कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२४/०६/प्र.क्र.१२०/ पर्यटन-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
**दिनांक : ३१ जुलै, २०२४.**

**संदर्भ :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१०/०८/ प्र.क्र.४६३/ पर्यटन, दिनांक ०४.११.२०१०.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ एप्रिल, २०२४.

**शासन निर्णय :** पर्यटन स्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत सन २०२४-२५ मध्ये खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या गडचिरोली जिल्ह्यातील कामांसाठी रुपये १५०.०० लक्ष रकमेस या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. (रुपये लक्षात)

| अ.क्र | कामे | प्रशासकीय मान्यता |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| गडचिरोली | ता. चामोर्शी जि. गडचिरोली येथील पर्यटन विकास कामे, जि. गडचिरोली | |
| १ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/600 TO 0/700 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| २ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/400 TO 0/500 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| ३ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/300 TO 0/400 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| ४ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/200 TO 0/300 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| ५ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/100 TO 0/200 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |

| | | |
|---|---|---|
| ६ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/000 TO 0/100 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| ७ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/500 TO 0/600 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| ८ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/700 TO 0/800 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| ९ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/800 TO 0/900 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| १० | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 0/900 TO 1/000 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| ११ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 1/000 TO 01/1/100 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| १२ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 1/100 TO 1/200 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| १३ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 1/200 TO 1/300 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| १४ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 1/300 TO 1/400 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| १५ | CONSTRUCTION OF WBM ROAD CONNECTING GHOT PTEGAON ROAD SH-378 TO BUDDH VIHAR KORTHRI APPROACH ROAD IN KM 1/400 TO 1/500 TAL. CHARMOSHI DIST. GADCHIROLI | १०.०० |
| | **एकूण (१+१५)** | **१५०.००** |

०२. वरील नमूद कामांसाठी जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार कार्यान्वयीन यंत्रणा नियुक्त करण्यात येत आहे. त्यानुसार खालील अटी व शर्तींचे अनुपालन व्हावे.

**०३. अटी व शर्ती :-**

१) उपरोक्त कामे दर्जेदार स्वरुपाची व्हावीत, याकरीता स्थापत्य विशारदांची (Theme Based Architect) नेमणूक करुन प्रत्यक्ष कामे नामांकित कंत्राटदारांच्या माध्यमातून करण्यात यावीत व त्या कामांचे योग्य संनियंत्रण आणि गुणनियंत्रण करण्यात यावे.

२) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

३) प्रशासकीय मान्यता मिळालेल्या कामांच्या निविदा प्रक्रिया तात्काळ राबवून कामांचे कार्यारंभ आदेश देण्याबाबतची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी. तसेच सदर कामे तीन वर्षाच्या कालावधीत पुर्ण करणे बंधनकारक राहील.

४) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च वित्त विभागाच्या प्रचलित आदेशांनुसार करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

६) पर्यटन विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून केलेल्या कामाच्या ठिकाणी सदर कामे पर्यटन विभागाने प्रादेशिक पर्यटन विकास योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून केली असल्याबाबतचे फलक लावण्यात यावेत.

७) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

८) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र ५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

९) तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

१०) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

११) योजनेत्तर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१२) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात संचालक, पर्यटन संचालनालय व संबंधित जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान / संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरीता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही, याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरीकांसाठी खुले राहील, अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१३) सदर निधीतून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत पर्यटन संचालनालयास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता पर्यटन संचालनालयामार्फत शासनास सादर करण्यात यावे.

१४) जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी काम कोणत्याही अन्य योजनेतून / निधीतून पुर्ण करण्यात आले नाही याची खात्री करुनच निधीचे वितरण करावे. मंजूर असलेले काम कोणत्याही अन्य योजनेतून / निधीतून पुर्ण करण्यात आले असल्यास संबंधित कामास वितरित केलेला निधी शासनास परत करण्यात यावा व झालेल्या अनियमिततेबद्दल संबंधितांवर उचित कारवाई करण्यात यावी.

१५) उर्वरित निधीची मागणी करताना उपयोगिता प्रमाणपत्र व कामाची गुणनियंत्रण यंत्रणेद्वारे प्रत्यक्ष तपासणी करुन कामाच्या गुणवत्तेबाबत व कामाच्या सद्यस्थितीबाबतचा प्रमाणित अहवाल (छायाचित्रांसह) शासनास सादर करण्यात यावा.

१६) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर कामाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी कार्यान्वयीन यंत्रणा व संबंधित संस्था यांची राहील.

१७) काम पूर्ण झाल्यानंतर सदर पर्यटक सुविधा तात्काळ उपयोगात आणण्याच्या दृष्टीने काम सुरु असतानाच पूर्व नियोजन करावे.

४. उपरोक्त तक्त्यातील कामांवर होणारा खर्च **मुख्यलेखाशीर्ष "मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील मंजुर तरतुदीमधून वितरीत करण्यात येईल.** तसेच सदर कामांच्या साठी निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन विकास योजनेंतर्गत) सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता सहायक जिल्हा नियोजन अधिकारी/ जिल्हा नियोजन अधिकारी, गडचिरोली यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' व जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना 'नियंत्रण अधिकारी' घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी जिल्हा कोषागार कार्यालय, गडचिरोली येथे देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल पर्यटन संचालनालयामार्फत शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

५. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ एप्रिल, २०२४ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दिनांक २५ एप्रिल, २०२४ च्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची व अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७३११९१८४०७६२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2024.07.31 19:32:56 +05'30'

**(संतोष जया विठ्ठल रोकडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, गडचिरोली.
६. जिल्हा नियोजन अधिकारी, गडचिरोली.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
८. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन-१.

***